महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या मंडळावर
अधिवक्त्यांची नियुक्ती करण्यासाठीचे
सुधारीत विनियमांस मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मजीप्रा-२०१४/प्र.क्र.२२७/पापु-२३**
मंत्रालय, मुंबई
तारीख: ८ जुलै, २०१५

वाचा :-

१) **शासन निर्णय,पा.पु.व स्व.वि. क्र. इएसटी-२००३/प्र.क्र.४९/पापु-२३, दि.७.५.२००४**
२) **शासन राजपत्र, क्र.पीएनए.१०८८/अ/उप-८, दि.२२.७.२००४**
३) **मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे पत्र क्र.जनरल/२०१३/ (६३)/ आ.८, दिनांक २९.१.२०१५**

प्रस्तावना :-

महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अधिनियम, १९७६ चे कलम ६६ नुसार, "महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या मंडळावर अधिवक्त्यांची नियुक्ती करण्यासाठीचे विनियम" तयार करण्यात आले असून ते संदर्भ क्र. २ येथील शासन राजपत्रात प्रसिध्द करुन महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास लागू करण्यात आले आहेत. तथापि, सदर विनियमातील काही कलमांमध्ये सुधारणा करणे आवश्यक असून सुधारीत विनियमांस महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या संचालक मंडळाच्या दि.२०.५.२०१४ रोजी झालेल्या १३० व्या बैठकीत मान्यता घेण्यात आली आहे. सदरहू सुधारीत विनियम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास लागू करणेस्तव त्यास शासनाची मान्यता घेऊन शासन राजपत्रात प्रसिध्द होणे आवश्यक असल्याने सुधारीत विनियमास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव मुख्य प्रशासकीय अधिकारी, म.जी.प्रा. यांनी संदर्भ क्र. ३ अन्वये शासनास सादर केला असून सदर बाब शासनाचे विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अधिनियम, १९७६ च्या कलम ६६ मधील तरतूदीचा वापर करुन, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाशी संबंधित न्यायालयीन प्रकरणांचे कामकाज हाताळण्यासाठी, उच्च न्यायालयाच्या वकील मंडळावर तसेच जिल्हा वकील मंडळावर अभिवक्त्यांची नियुक्ती करण्यासाठी, सोबत जोडलेल्या, "महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या मंडळावर अधिवक्त्यांची नियुक्ती करण्यासाठीचे विनियम" हे विनियम (मराठी) विहित करण्यात येऊन ते महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास लागू करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने, सोबत जोडलेले "महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या मंडळावर अधिवक्त्यांची नियुक्ती करण्यासाठीचे विनियम" या विनियमाचे प्रारुप राजपत्रात प्रसिध्द करावे. सदर विनियम शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून अस्तित्वात येईल.

३. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने, सुधारीत विनियमानुसार राज्य स्तरावर आणि जिल्हा स्तरावर अधिवक्त्यांचे पॅनेल तयार करुन विनियमातील तरतूदींप्रमाणेच कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०७१५१४१७५९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MHASKE GAURI RAHUL

Digitally signed by MHASKE GAURI RAHUL
DN: CN = MHASKE GAURI RAHUL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 918027
Date: 2015.07.08 15:40:53 +05'30'

**गौरी रा. म्हस्के**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
४. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई
८. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
९. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,सिडको भवन, नवी मुंबई
१०.मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१.
११.निवड नस्ती

**महाराष्ट्र जीवन प्राधिकरण**

**सिडको भवन,नवी मुंबई**

**महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या मंडळावर अधिवक्त्यांची नियुक्ती करण्यासाठीचे विनियम**

१ हे विनियम "महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या मंडळावर अधिवक्त्यांची नियुक्ती करण्यासाठीचे विनियम" म्हणून ओळखले जातील.

२ हे विनियम राजपत्रात प्रसिध्द होण्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

३ या विनियमांमध्ये संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर -

(क) "मंडळ " याचा अर्थ, एका किंवा त्याहून अधिक जिल्हयांचा समावेश असलेला महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचा एखादा भाग किंवा परिमंडळ असा आहे आणि त्याच्या प्रमुखपदी अधीक्षक अभियंता असेल.

(ख) "विभाग" याचा अर्थ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या मंडळाचा एखादा भाग, असा आहे आणि त्याच्या प्रमुखपदी कार्यकारी अभियंता असेल.

(ग) "महाराष्ट्र जीवन प्राधिकरण " याचा अर्थ, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अधिनियम १९७६ याच्या कलम ८(३) खाली केलेल्या व्याख्येनुसार मुख्य कार्यकारी अधिकारी असा आहे.

(घ) "सदस्य सचिव "याचा अर्थ महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अधिनियम,१९७६ याच्या कलम ८(३) खाली केलेल्या व्याख्येनुसार मुख्य कार्यकारी अधिकारी असा आहे.

(ङ) "उप विभाग" याचा अर्थ महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या एखाद्या विभागाचा एखादा भाग असा आहे आणि उप विभागीय अधिकारी त्याच्या प्रमुखपदी असेल.

(च) "परिमंडळ" याचा अर्थ,कोकण (ठाणे), पुणे,नाशिक,औरंगाबाद,अमरावती व नागपूर हे सहा महसूली विभाग असा आहे आणि त्यांच्या प्रमुखपदी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या त्या त्या विभागाचा मुख्य अभियंता असेल.

४ उच्च न्यायालयाच्या मुंबई,औरंगाबाद व नागपूर खंडपीठासमोर येणा-या प्रकरणावर खालील पध्दतीने कार्यवाही करण्यांत येईल.

(१)**औरंगाबाद खंडपीठ, नागपूर खंडपीठ व मा. मुंबई उच्च न्यायालय,मुंबई यांच्या समोर येणारी प्रकरणे हाताळणेसाठी वकीलांचे पॅनल तयार करणेसाठी मुख्य प्रशासकीय अधिकारी यांचे अध्यक्षतेखाली एक स्वतंत्र समिती खालील प्रमाणे गठीत करण्यांत येईल.**

**१.मुख्य प्रशासकीय अधिकारी - अध्यक्ष**

**२.संबंधित परिमंडळातील ज्येष्ठ अधीक्षक अभियंता- सदस्य**

**३.कायदा व कामगार अधिकारी - समितीचे सदस्य सचिव**

(२) **औरंगाबाद,नागपूर खंडपीठ व मा. मुंबई उच्च न्यायालय,मुंबई येथील वकीलांच्या पॅनलवर समावेश करावयाच्या अधिवक्त्यांची संख्या प्रत्येकी तीन पेक्षा अधिक नसेल.**

(३) अशा मंडळामध्ये अंतर्भाव करावयाच्या अधिवक्त्यांकडे उच्च न्यायालयातील दहा वर्षाहून कमी नसेल इतका वकिली व्यवसायाचा प्रत्यक्ष अनुभव असला पाहिले.

(४) **हे पोट कलम वगळण्यात आले आहे.**

(५) या मंडळावर अधिवक्त्यांचा समावेश करण्यासाठी पुढील कार्यपध्दती अनुसरण्यात येईल.

**(क) विनियम ४(१) अन्वये गठीत समिती ही मुंबई,औरंगाबाद व नागपूर येथील** मा. उच्च **न्यायालयात मजीप्रा चे प्रतिनिधत्व करण्यासाठी जे सक्षम अधिवक्ते इच्छूक आहेत, अशा अधिवक्त्यांचा अधिवक्ता मंडळात समावेश करण्यात यावा यासाठी, संबंधित विभागामध्ये प्रसारित होणा-या जास्तीत जास्त खपाच्या दैनिकात जाहिरात देऊन अर्ज मागवावेत व असे इच्छूक उमेदवारांचे अर्ज प्राप्त झाल्यावर निवड समितीव्दारे संबंधित इच्छूक उमेदवारांची मुलाखत घेऊन सुयोग्य वकीलाची निवड, निवड समितीव्दारे पॅनलवर करण्यात येईल.**

(ख) सर्व इच्छूक अधिवक्त्यांची नांवे,त्यांची गुणवत्ता याच्या काटेकोर आधारावर त्यांची वैयक्तिक माहिती, शैक्षणिक अर्हता व अनुभवाचा तपशिल इत्यादिसह निवड समितीपुढे ठेवण्यात येतील. मा. मुंबई उच्च न्यायालय व त्याची औरंगाबाद व नागपूर खंडपीठे, यापुढील कामकाज हाताळण्यासाठीच्या अधिवक्ता मंडळात समावेश करण्यासाठी, प्रत्येकी ३ अधिवक्त्यांची नावे निश्चित करण्यात येतील.

(ग) निवड समितीचे निर्णय हे, शक्यतोवर मतैक्याने घेण्यात येतील. तथापि, निवड समितीच्या सदस्यांमध्ये निवडीच्या मुद्यावरुन मतभिन्नता अथवा समबंध निर्माण झाल्यास, निवड समितीच्या अध्यक्षास निर्णायक मत देण्याचा अधिकार असेल.

(घ) जो अधिवक्ता,निवड समितीच्या निर्णयावर प्रत्यक्षपणे अथवा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न करील तो अनर्ह ठरेल आणि निवड समिती निवड करतेवेळी,त्यांचे नाव विचारात घेणार नाही.

(६) सदस्य सचिवास किंवा यथास्थिती संबंधित मुख्य अभियंत्यास, कोणते प्रकरण/मिसल कोणत्या अधिवक्त्याकडे द्यावयाचे, याबाबतचा स्वेच्छा निर्णय घेता येईल.

(७) ज्या अधिवक्त्यास, मा. उच्च न्यायालयाच्या प्रकरणासाठी अधिवक्ता मंडळावर घेण्याचा विचार असेल, त्यास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक मंडळ वेळोवेळी निश्चित करील त्या दराने पारिश्रमिक प्रदान करण्यात येईल.

(८) उच्च न्यायालयीन प्रकरणासाठी मंडळात समावेश करण्यात आलेला अधिवक्ता, प्रत्येक प्रकरण दाखल करुन घेतल्याबाबतची/त्याची सुनावणी/ कार्यवाही/ निर्णय याबाबतची लेखी माहिती त्या त्या वेळी संबंधित मुख्य अभियंत्यास / सदस्य सचिवास कळविण्यास कर्तव्यबध्द असेल.

५ (१) **दिवाणी,फौजदारी,कामगार व औद्यागिक न्यायालयीन प्रकरणे मंडळ व विभागीय पातळीवर हाताळण्यासाठी त्या त्या क्षेत्रिय पातळीवर प्रत्येक जिल्हयासाठी वकील मंडळ तयार करण्यात येईल आणि त्या प्रयोजनासाठी त्या त्या परिमंडळासाठी संबंधित प्रादेशिक विभागाचे मुख्य अभियंता यांच्या अध्यक्षतेखाली निवड समिती पुढील प्रमाणे गठीत करण्यात येईल.**

**१.संबंधित प्रादेशिक विभागाचे मुख्य अभियंता - अध्यक्ष**

**२.परिमंडळातील सर्व अधीक्षक अभियंता - सदस्य**

**३.त्या परिमंडळातील एक सर्वात जेष्ठ कार्यकारी अभियंता -सदस्य**

**४.परिमंडळ कार्यालयातील विशेष अधिक्षक किंवा कार्यालय अधीक्षक- सदस्य सचिव**

(२) प्रत्येक जिल्हा मंडळामध्ये सामान्यपणे दिवाणी/फौजदारी/कामगार व औद्योगिक न्यायालयामधील दहा वर्षाहून कमी नसेल इतका अनुभव धारण करणारे/इतका काळ व्यवसाय करणारे दोन वकिल असतील. तथापि, निवड समिती हाती असलेल्या प्रकरणांच्या आधारे, एखाद्या विशिष्ट जिल्हयासाठी दोन पेक्षा अधिक वकिलांची नियुक्ती करण्यास सक्षम

असेल त्यामुळे प्रत्येक वकिलाला २५ पेक्षा अधिक प्रकरणे हाताळण्याची आवश्यकता भासणार नाही.

(३) प्रत्येक जिल्हा मंडळावरील दोन वकिलांपैकी एक वकील हा दिवाणी/फौजदारी शाखेतील असला पाहिजे, तर दुसरा वकील औद्योगिक / कामगार शाखेतील असला पाहिजे.

(४)संबंधित **प्रादेशिक मुख्य अभियंता हा संबंधित वकील परिषदाकडून आणि अन्य ठिकाणाहून मजीप्रा पॅनेलवर काम करण्यास इच्छूक असलेल्या वकीलांची नावे व त्यांची वैयक्तिक माहिती त्या विभागामध्ये जास्त खपाच्या दैनिकात जाहिरात देऊन मागवील. प्राप्त झालेली सर्व आवेदनपत्रे अंतिम निवडीसाठी निवड समितीसमोर ठेवील आणि प्राप्त झालेल्या इच्छूक उमेदवारांची मुलाखत निवड समिती व्दारे घेण्यात येऊन सुयोग्य वकिलाची नियुक्ती पॅनलवर करण्यात येईल.**

(५) निवड समिती, इतर गोष्टीबरोबरच, संबंधित अर्जदारांचा शैक्षणिक अभिलेख, अनुभव, हाताळलेल्या प्रकरणांतील यशाचे प्रमाण इत्यादि स्वरुपातील त्यांचे गुणावगुणे विचारात घेईल आणि गुणवत्तेनुसार उमेदवारांची काटेकोरपणे निवड करील.

(६) प्रत्येक जिल्हा मंडळावर घेतलेल्या वकिलांना, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या संचालक मंडळाने वेळोवेळी ठरवून दिलेल्या दरानुसार पारिश्रमिक देण्यात येईल.

(७) जिल्हा मंडळावर नियुक्त केलेला प्रत्येक वकील, संबंधित अधिक्षक अभियंत्याला/कार्यकारी अभियंत्याला प्रत्येक प्रकरणाची स्वीकृती/ सुनावणी/ कार्यवाही/ निर्णय याबाबत वेळीच लेखी माहिती देण्यास कर्तव्यबध्द असेल.

६ मा. उच्च न्यायालयाच्या मंडळावरील तसेच जिल्हा मंडळावरील वकिलांना त्यांच्या नियमित पारिश्रमिकाव्यतिरिक्त टंकलेखनाचा/छायांकित प्रतीचा खर्च, आवश्यक त्या पावत्या सादर केल्यावर देण्यात येईल.

७ महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला आवश्यकता भासेल त्याप्रमाणे व तेव्हा कायदेविषयक लेखी मत देणे, हे मंडळावरील वकिलावर बंधनकारक असेल त्या प्रयोजनासाठी मंडळावरील वकिलाला कोणतेही अतिरिक्त वेतन किवा पारिश्रमिक देण्यात येणार नाही.

८ महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या उच्च न्यायालयातील मंडळावर किंवा जिल्हा मंडळावर असलेला कोणताही वकील जो पर्यंत, तो महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या मंडळावर असेल, तो पर्यंत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या विरोधात असेलेले कोणतेही मिसल (काम)/प्रकरण घेणार नाही. उच्च न्यायालयाच्या

मंडळावरील तसेच जिल्हा मंडळावरील कोणताही वकील, प्राधिकरणाच्या विरोधात असणारे कोणतेही मिसल (काम) /प्रकरण घेईल किंवा अन्यथा, त्याच्या हितसंबंधाविरुध्द काम करीत असल्याचे आढळून येईल तर, तो आपोआप अनर्ह ठरेल. संबंधित निवड समितीचा अध्यक्ष, अशा अनर्ह ठरलेल्या वकीलाचे नाव, वकील मंडळावरुन ताबडतोब काढून टाकील.

९ निवड **झालेल्या व मंडळावर घेतलेल्या वकीलास संबंधित मुख्य अभियंता किंवा यथास्थिती, सदस्य सचिवला उद्देशून लिहिलेली एक महिन्याची आगाऊ नोटीस देऊन मंडळाचा राजीनामा देता येईल.**

१० सदस्य सचिव, प्रकरणांकडे नीट, साक्षेपाने लक्ष न दिल्याबद्दल किंवा प्राधिकरणाच्या हित संबंधाना बाधा पाहोचेल अशा रीतीने काम केल्याबद्दल किंवा इतर कोणत्याही एका किंवा अनेक कारणांबद्दल नैसर्गिक न्यायतत्वे अनुसरल्यानंतर, किमान सात दिवसाची कारणे दाखवा नोटीस देऊन मा. उच्च न्यायालयाच्या वकील मंडळावरील किंवा जिल्हा मंडळावरील कोणत्याही वकिलास काढून टाकण्यास सक्षम असेल.

११ राजीनामा, काढून टाकणे, मृत्यू किंवा अक्षमता या कारणांमुळे रिक्त झालेले पद या विनियमांमध्ये विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार भरण्यात येईल.

१२ सदस्य **सचिवास विशिष्ट प्रकरणामध्ये जर त्याच्यामते प्राधिकरणाचे हित / सार्वजनिक हित सुरक्षित ठेवण्यासाठी प्रस्तुत मंडळावर, बाहेरच्या कोणत्याही वकिलाला नियुक्त करण्याची कार्यवाही करणे आवश्यक असल्यास, त्याबद्दलची लेखी कारणे नमूद केल्यानंतर करता येईल. अशा विशेष वकिलाला/समुपदेशीला, योग्य ते परिश्रमिक देण्याचा अधिकार सदस्य सचिव यांना राहील.**

१३ **मंडळाचा/वकिलाचा पदावधी पाच वर्षासाठी असेल. आवश्यकतेनुसार एका वेळेस आणखी तीन वर्षाच्या कालावधीसाठी, केवळ गुणवतेच्या आधारावरच त्याचे नवीकरण करण्यात येईल. नवीकरण करणे किंवा नवीकरण नाकारणे याबाबत एकमेव स्वेच्छाधिकार निवड समितीला असेल.**

१४ या विनियमांमध्ये सुधारणा करण्याचा अधिकार,महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या संचालक मंडळाकडे निहित असेल. तथापि, या विनियमांची कोणतीही सुधारणा शासनाच्या पूर्वमान्यतेनेच अंमलात येईल.

मुख्य प्रशासकीय अधिकारी,
महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
सिडको भवन,नवी मुंबई.

नवी मुंबई
दिनांक :